**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सातारा या संस्थेकरीता सुरक्षारक्षकांची पदे महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळामार्फत उपलब्ध करून देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.१४५/प्रशासन-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ०८ जून २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः मासैम-१०९९/२३९०/प्र.क्र.२४४/९९/२८, दिनांक १४.११.२००२.
२) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः एमईडी-२०१०/प्र.क्र.७३(अ)/२०१०/शिक्षण-१, दिनांक ३१.०१.२०१२.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.२२९/प्रशासन-२, दि. १७.०४.२०१५.
४) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः एमईडी-२०१३/प्र.क्र.२११/१३/शिक्षण-१, दिनांक ०३.०१.२०२२.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:- पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दिनांक २७.०४.२०२२.
६) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सातारा यांचे पत्र क्र. जा.क्र. नवनिर्मितशावैमसा/सुरक्षारक्षक/मेस्को/११८३/२३, दिनांक २२.०५.२०२३.
७) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सातारा यांचे पत्र क्र. जा.क्र. नवनिर्मितशावैमसा/सुरक्षारक्षक/मेस्को/१२४२/२३, दिनांख ०१.०६.२०२३.

**प्रस्तावना :-**

विभागाच्या संदर्भ क्र. २ वरील दिनांक ३१.०१.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सातारा येथे १०० विद्यार्थी क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ५०० रुग्ण खाटांचे रुग्णालय सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. ४ वरील दिनांक ०३.०१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षासाठी १०० विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यास मान्यता देण्यात आली आहे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय परिसरामध्ये विद्यार्थी, प्राध्यापक व अन्य शासकीय कर्मचा-यांच्या सुरक्षीततेसाठी बाह्यस्रोताद्वारे सुरक्षा रक्षक उपलब्ध करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सातारा या संस्थेमध्ये प्रवेशित विद्यार्थी, विद्यार्थीनी तसेच संस्थेमधील प्राध्यापक/सह प्राध्यापक व अन्य शासकीय कर्मचा-यांच्या सुरक्षेच्यादृष्टीने ४२ सुरक्षा रक्षक (४१ सुरक्षा रक्षक व १ महिला सुरक्षा पर्यवेक्षक) महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), पुणे या शासन मान्यता प्राप्त महामंडळाने निश्चित केलेल्या दरानुसार उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता येणा-या वार्षिक रु. १,३८,४३,९५०/- (अक्षरी रुपये एक कोटी अडतीस लाख त्रेचाळीस हजार नऊशे पन्नास फक्त) एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -४, अ.क्र. ११ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर बाबींसाठी येणारा खर्च शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सातारा या संस्थेस त्यांचे लेखाशिर्षाखाली २२१० ई ९११ मधील (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत वित्तीय वर्षात अर्थसंकल्पित निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०८१५३४१२३५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.06.08 04:48:28 -07'00'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र, मुंबई.
३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. अधिष्ठाता / अधिक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सातारा.
८. निवडनस्ती (प्रशा-२)